**“भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय आणि संग्रहालय” यासंदर्भात तज्ञ सल्लागार समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एडीआर-२०२२/प्र.क्र.१४ /तांशि-६,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:- १६ मार्च, २०२२

वाचा:- १) शासन निर्णय क्रमांक एडीआर-२०२०/प्र.क्र.९०/तांशि-६ दिनांक २८ जानेवारी,२०२१
२) शासन निर्णय क्रमांक एडीआर-२०२२/प्र.क्र.१४/तांशि-६ दिनांक ९ फेब्रुवारी,२०२२

**प्रस्तावनाः-**

आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय स्थापन करण्यासंदर्भात अभ्यास करून शासनास अहवाल सादर करण्यासाठी उपरोक्त दिनांक २८ जानेवारी, २०२१ च्या शासन निर्णयान्वये, पं.हृदयनाथ मंगेशकर यांच्या अध्यक्षतेखाली १४ सदस्यांचा समावेश असलेली समिती गठित करण्यात आली आहे. तसेच, सदर शासन निर्णयान्वये समितीकरिता कार्यकक्षा देखील विहित करण्यात आली आहे. प्रस्तावित संगीत महाविद्यालयाचे नाव “भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय” (Bharatratna Lata Dinanath Mangeshkar International Music College) असे करण्याचा शासन निर्णय दिनांक ९ फेब्रुवारी,२०२२ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

०३. भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय आणि संग्रहालय स्थापन करण्यासंदर्भात त्वरीत कार्यवाही करता यावी याकरिता उपरोक्त दिनांक २८ जानेवारी, २०२१ च्या शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेल्या सर्व सदस्यांसोबत विचारविमर्ष करून शासनास अहवाल सादर करण्यासाठी तज्ञ सल्लागार समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

“भारतरत्न लता दीनानाथ मंगेशकर आंतरराष्ट्रीय संगीत महाविद्यालय आणि संग्रहालय” स्थापन करण्यासंदर्भात खालील सदस्यांचा समावेश असलेली तज्ञ सल्लागार समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री.हृदयनाथ मंगेशकर | अध्यक्ष |
| २ | श्रीमती उषा मंगेशकर | सदस्य |
| ३ | श्री. आदिनाथ मंगेशकर | सदस्य |
| ४ | श्री.शिवकुमार शर्मा | सदस्य |
| ५ | श्री.मयुरेश पै | समन्वयक |
| ६ | संचालक, कला संचालनालय | सदस्य सचिव |

०२. तज्ञ सल्लागार समितीने दिनांक २८ जानेवारी, २०२१ च्या शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेल्या अभ्यास समितीमधील सदस्यांसोबत विचाराविमर्ष करावा. तसेच, अभ्यास समितीकरिता विहित करण्यात आलेली कार्यकक्षा विचारात घेऊन आणि अनुषंगिक सर्व बाबींचा अभ्यास करून आपला अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३१६११५३५६९६०८ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandesh Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c8997 45eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2022.03.16 11:57:28 +05'30'

**(सं.रा.उतेकर)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) श्री.हृदयनाथ मंगेशकर, १०१, प्रभुकुंज, पेडर रोड, मुंबई ४०० ०२६
६) श्रीमती उषा मंगेशकर, १०१, प्रभुकुंज, पेडर रोड, मुंबई ४०० ०२६
७) श्री. आदिनाथ मंगेशाकर, १०१, प्रभुकुंज, पेडर रोड, मुंबई ४०० ०२६
८) श्री.शिवकुमार शर्मा, २२, राजीव अपार्टमेंट, झिगझॅग रोड, पाली हिल, वांद्रे (प.), मुंबई ४०० ०५०
९) श्री.मयुरेश पै, ४०१, ब्ल्यू माऊंटन, अप्पर गोवींद नगर, शनी मंदिराजवळ, मालाड(पू), मुंबई ४०० ०९७
१०) निवड नस्ती (ताशि-६), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.